**राज्यातील अ वर्ग पर्यटन स्थळे घोषित करण्यासाठी निकष निश्चित करण्यासाठी समितीची स्थापना करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः विकाक-२०१४/३/प्र.क्र.२७२/पर्यटन**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई -४०००३२

तारीख: ७ ऑक्टोबर, २०१५

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्रमांकः गृह विभाग (पर्यटन) क्र.एमटीसी-१०९६/प्र.क्र.५२३/पर्यटन, दि.८/११/१९९६.

२) शासन निर्णय क्रमांकः नगर विकास विभाग क्र.संकीर्ण-७८९६/१८३०/ प्र.क्र.७८/९६/ न.वि.१८, दि.१७/५/१९९६.

३) शासन निर्णय क्रमांकः पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.टीडीएम-२०१४/८/प्र.क्र.४६३/ पर्यटन, दि.४/११/२०१०.

४) शासन निर्णय क्रमांक : पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,क्र.टीएीएस-२०११/१२/ प्र.क्र.८५५/पर्यटन, दि.१६/१/२०१२.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णय गृह विभाग (पर्यटन) दि.८/११/१९९६ अन्वये राज्यातील पर्यटन स्थळांची निवड व त्यांचे 'अ', 'ब' व 'क' वर्गीकरण याबाबत खालीलप्रमाणे निकष ठरविण्यात आले होते.

१)अ श्रेणी- राष्ट्रीय व आंतराष्ट्रीय किर्तीची ठिकाणे, केंद्र शासन/परराष्ट्राकडून मिळणाऱ्या अर्थसहाय्याने विकसित करण्यात येणारी ठिकाणे. एलिफंटा बेटाचा विकास,अजंठा/वेरूळ विकास योजना,जागतिक-सांस्कृतिक वारसा असलेली ठिकाणे व सिंधुदुर्ग जिल्ह्यातील पर्यटन विकास व त्याचप्रमाणे विदर्भातील एक मुख्य प्रकल्प

२)ब श्रेणी- राज्य स्तरावरील महत्वाची ठिकाणे,राज्याच्या साधनसंपत्तीमधून विकसित करण्यात येणारी स्थळे. शासनाने व वैधानिक विकास मंडळांनी राज्यातील पर्यटन क्षेत्रांचा विकास करण्यासाठी निवडलेली ३६ स्थळे

३)क श्रेणी- जिल्हा स्तरावर स्थानिक महत्व असलेली ठिकाणे. जिल्हा नियोजन व विकास मंडळाने उपलब्ध केलेल्या तरतुदीमधून विकसित करण्यात येणारी ठिकाणे.

मात्र उपरोक्त संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये सुधारित प्रादेशिक पर्यटन विकास योजना तयार करण्याच्या अनुषंगाने पर्यटनस्थळांची निवड करणे व त्यांच्या विकासाचे प्रस्ताव / आराखडे सादर करण्याबाबत निकष /मार्गदर्शक सूचना देण्यात आल्या व वर नमूद दि.८/११/१९९६ चा वर्गीकरणाबाबतचा शासन निर्णय रद्द करण्यात आला. त्यानंतर संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये राज्यातील ब व क वर्ग पर्यटन स्थळे घोषित करण्याबाबत तरतूद करण्यात आली. मात्र, अ वर्ग पर्यटन स्थळाबाबत कोणतीही तरतूद केलेली नाही. त्यामुळे राज्यात अ वर्ग पर्यटन स्थळे घोषित करण्यासाठी निकष तयार करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यात अ वर्ग पर्यटन स्थळे घोषित करण्यासाठी निकष विहित करणारी सध्या कोणतीही तरतूद अस्तित्वात नाही. त्यामुळे राज्यात अ वर्ग पर्यटन स्थळे घोषित करण्यासाठी निकष तयार करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती स्थापन करण्यात येत आहे.

| अ.क्र. | सदस्याचे नाव | पद |
|---|---|---|
| १. | सचिव(पर्यटन),पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग | अध्यक्ष |
| २. | व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ | सदस्य |
| ३. | जिल्हाधिकारी,नागपूर | सदस्य |
| ४. | प्रादेशिक संचालक,भारत पर्यटन,मुंबई | सदस्य |
| ५. | सहसचिव/उपसचिव(योजन),ग्राम विकास व जलसंधारण विभाग | सदस्य |
| ६. | सहसचिव/उपसचिव(तीर्थक्षेत्र विकास),नगर विकास विभाग | सदस्य |
| ७. | संचालक,पुरातत्व विभाग | सदस्य |
| ८. | उपसचिव(पर्यटन) | सदस्य-सचिव |

२. सदर समितीने अ वर्ग पर्यटन स्थळाचे निकष तयार करुन ते शासनास एक महिन्यात सादर करावेत.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१००८१४५५०६४७२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra Laxmikant Lakhote

Digitally signed by Ravindra Laxmikant Lakhote
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=421202, st=Maharashtra, cn=Ravindra Laxmikant Lakhote
Date: 2015.10.08 14:56:59 +05'30'

(र.ल.लखोटे)

कार्यासन अधिकारी

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
५) मा. राज्यमंत्री, पर्यटन यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई.
७) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -२,नागपूर.
८) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई / जिल्हा कोषागार अधिकारी
९) अपर मुख्य सचिव , नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) प्रधान सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) सचिव (पर्यटन), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
१३) जिल्हाधिकारी,नागपूर
१४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नागपूर.
१५) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग,नागपूर
१६) ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) सभापती नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर.
२०) मुख्य सचिव यांचे उप सचिव

२१) जिल्हा नियोजन अधिकारी,नागपूर.

२२) मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद

२३) मा. विरोधी पक्ष नेता महाराष्ट्र विधानसभा

२४) सर्व विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानसभा.

२५) सर्व विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानपरिषद

२६) अतिरिक्त जिल्हाधिकारी, तथा जिल्हा पर्यटन समन्वय अधिकारी,नागपूर,

२७) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.

२८)निवड नस्ती, पर्यटन.